महाराष्ट्र गुंठेवारी विकास
(नियमाधीन करणे, श्रेणीवाढ व
नियंत्रण) अधिनियम, २००१- प्रशमन
शुल्क व विकास शुल्क निश्चितीबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्र. गुंठेवा-१०२१/प्र.क्र.४८/२०२१/नवि-३०,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- १८.१०.२०२१

**संदर्भ** :- १) शासन नगर विकास विभागाचे आदेश क्र.अनबां-१०२०/४८०/प्र.क्र.७९/ भाग-२/नवि-२०, दि.१८ मे, २००१.
२) महाराष्ट्र गुंठेवारी विकास (नियमाधीन करणे, श्रेणीवाढ व नियंत्रण) अधिनियम, २००१ यात सुधारणा करण्यासाठी अधिनियम दि.१२ मार्च, २०२१.

**आदेश**

महाराष्ट्र गुंठेवारी विकास (नियमाधीन करणे, श्रेणीवाढ व नियंत्रण) अधिनियम, २००१ च्या कलम ३ च्या पोटकलम (३) च्या परंतुकान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन विकास आकार आणि प्रशमन शुल्काबाबत संदर्भाधीन दि.१८.०५.२००१ रोजीचे आदेश पारित करण्यात आले होते. तथापि, आता संदर्भाधीन दि.१८.०५.२००१ रोजीचे आदेश सुधारित करण्यात येत असून त्यानुषंगाने महाराष्ट्र गुंठेवारी विकास (नियमाधीन करणे, श्रेणीवाढ व नियत्रण) अधिनियम, २००१ च्या कलम ३ च्या पोटकलम (३) च्या परंतुकान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन शासन, गुंठेवारी पध्दतीने झालेला विकास नियमित करण्यासाठी खाली नमुद केल्याप्रमाणे सुधारीत प्रशमन शुल्क आणि सुधारित विकास शुल्क निश्चित करीत आहे.

गुंठेवारी विकास नियमित करताना खाली नमूद केल्यानुसार प्रशमन शुल्क व विकास शुल्क आकारण्यात यावे.

| अ. क्र | मुद्दा | प्रशमन शुल्क | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | म.न.पा क्षेत्र | अ वर्ग न.पक्षेत्र | ब वर्ग न.पक्षेत्र | क वर्ग न.प क्षेत्र | वि.नि. प्राधिकरण/ नवनगर वि. प्राधिकरण क्षेत्र | इतर क्षेत्र |
| १ | २ | ३ | | | | | |
| १. | रेखांकने | विकास शुल्काच्या तीन पट | | | | | |
| २. | रेखांकनातील भूखंड | उपरोक्त १ नुसार रक्कम वसूल झाली नसल्यास विकास शुल्काचे तीन पट | | | | | |
| ३. | मूळ अनुज्ञेय च.क्षे.नि | निरंक | | | | | |
| ४. | मूळ अनुज्ञेय च.क्षे.नि., पेक्षा अधिक केलेले बांधकाम<br><br>**टीप-** मूळ अनुज्ञेय च.क्षे.नि.,पेक्षा अधिक केलेले बांधकाम हे विकास योजना, प्रादेशिक योजनांसाठी शासनाने दि.०२.१२.२०२० रोजी मंजूर केलेल्या | कॉलम २ मधील नमूद मूळ अनुज्ञेय च.क्षे.नि., पेक्षा अधिक बांधकामक्षेत्रासाठी वार्षिक बाजारमूल्य दर तक्त्यामधील जमिन दराच्या १०% नुसार हिशेबित होणारी रक्कम.<br><br>**टीप-**सदर १०% रक्कम ही अधिमूल्याद्वारे प्राप्त तसेच हस्तांतरणीय विकास हक्काद्वारे प्राप्त झालेल्या च.क्षे.नि., मुळे हिशोबित होणाऱ्या एकत्रित अतिरिक्त बांधकाम क्षेत्रासाठी असून कॉलम-२ मधील टीपेत नमूद केलेल्या अधिमूल्या व्यतिरिक्त असेल. | | | | | |

| | | |
|---|---|---|
| | एकत्रिकृत विकास नियंत्रण व प्रोत्साहन नियमावलीमधील तरतुदीनुसार अधिमूल्याचा भरणा करुन प्राप्त होणारा अतिरिक्त च.क्षे.नि., गुंठेवारी विकासासाठी अनुज्ञेय असलेल्या हस्तांतरणीय विकास हक्कानुसार प्राप्त च.क्षे.नि., यांच्या मर्यादेत असणे आवश्यक आहे. | |
| ५ | सामासिक अंतरात केलेले बांधकाम. | सामासिक अंतरात केलेल्या बांधकामासाठी वार्षिक बाजारमूल्य दर तक्त्यामधील जमिन दराच्या १०% नुसार हिशेबित होणारी रक्कम. |

| | |
|---|---|
| • **विकास शुल्क** | महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम १२४ (अे) व दि.०२.१२.२०२० रोजीची मंजूर एकत्रिकृत विकास नियंत्रण व प्रोत्साहन नियमावलीमधील नियम क्र.२.२.१३ नुसार विकास शुल्क आकारण्यात यावे. |

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१८१२०६०५६५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Veena More

Digitally signed by Veena More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d71f88afbdaebfd4efea93eae71378a4ad1be5ded7210886ce1e6750fe39829b, serialNumber=57c584dd5bcdc9ca4d84e4078fe62fadc5687db118fa7f3ab707135e5660a410, cn=Veena More
Date: 2021.10.20 11:20:45 +05'30'

**( वीणा मोरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत माहितीसाठी व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी,**

१) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव महसूल/गृह/ग्राम विकास/गृहनिर्माण/विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) सर्व विभागीय आयुक्त.
४) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई उपनगरे, बृहन्मुंबई वगळून).
५) सर्व महानगरपालिका आयुक्त, (मुंबई महानगर प्रदेशातील महानगरपालिका वगळून)
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा.
७) सर्व विशेष नियोजन प्राधिकरण.
८) सर्व पोलीस आयुक्त (मुंबई वगळून)
९) सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक.
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
११) संचालक, नगर पालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
१२) संचालक, नगर रचना व मुल्य निर्धारण विभाग, पुणे.
१३) सहसंचालक, नगर रचना (सर्व विभाग)

१४) सहायक संचालक, सर्व नगर रचना व मुल्य निर्धारण शाखा.
१५) मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा / नगरपंचायती (मुंबई महानगर क्षेत्रातील नगरपरिषदा वगळून)
१६) सर्व कार्यासने, नगर विकास विभाग.
१७) निवडनस्ती (नवि-३०)

**प्रत माहितीसाठी**

१) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
२) मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव.
४) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव.
५) मा. मंत्री (महसूल/ग्रामविकास/गृह/गृहनिर्माण/विधी व न्याय विभाग) यांचे खाजगी सचिव.
६) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक.